उप सचिव पदावरून सह सचिव पदावर
तात्पुरती पदोन्नती देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः ससप-१३२१/प्र.क्र.१३२/का.१४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ४ मे, २०२२

**आदेश**

खालील उप सचिवांना या आदेशाच्या दिनांकापासून सह सचिव पदावर तात्पुरती पदोन्नती देण्यात येत असून त्यांची पदोन्नतीनंतरची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ ५ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विभागामध्ये करण्यात येत आहे.-

| अ. क्र. | उप सचिवांचे नाव | जात प्रवर्ग | सध्याचा विभाग | सह सचिव पदावर पदोन्नतीनंतर पदस्थापनेचा विभाग |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | डॉ.नामदेव कोंडिबा भोसले | खुला | कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग | कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग |
| २ | श्रीमती पुष्पा प्रकाश साबळे | इमाव | सामान्य प्रशासन विभाग सध्या प्रतिनि-प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी, कोकण भवन, नवी मुंबई | प्रपत्र बढती -प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी, कोकण विभाग, नवी मुंबई |
| ३ | श्री.संजय दत्तात्रय कमलाकर | अ.जा. | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग |
| ४ | श्री.खालिद बशीर अहमद अरब | खुला | सामान्य प्रशासन विभाग - सध्या प्रतिनि - प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी, औरंगाबाद | प्रपत्र बढती - प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद |
| ५ | श्रीमती स्मिता दत्तात्रय निवतकर | खुला | महिला व बाल विकास विभाग - सध्या प्रतिनि - मा.मुख्यमंत्री सचिवालय | प्रपत्र बढती - मा.मुख्यमंत्री सचिवालयातील सह सचिव पदावर |
| ६ | श्री.संजय रघुनाथ बनकर | खुला | महसुल व वन विभाग | महसुल व वन विभाग |

२. श्रीमती पु.प्र.साबळे, श्री.खालिद अरब व श्रीमती स्मि.द.निवतकर यांना महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियम ४०, परिशिष्ट-२, अट क्र.१८ नुसार तदर्थ स्वरूपात प्रपत्र बढती (पदोन्नती) देण्यात येत आहे. सदर तरतुदीनुसार प्रपत्र बढतीचा कालावधी हा आदेशाच्या दिनांकापासून ६ महिन्यांचा राहील. त्यानंतर सदर अधिकाऱ्यानी मंत्रालयीन विभागात हजर होणे आवश्यक राहील.

३. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.४.८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-१६-ब यांच्या शासन निर्णय दि.७.५.२०२१ मधील तरतुदीनुसार पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.५.२००४ च्या स्थितीनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून भरण्यात येत आहेत.

४. सदर अधिकाऱ्यांना सह सचिव पदावरील तात्पुरती पदोन्नती खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.-

(अ) सदरची पदोन्नती अत्यंत तात्पुरत्या स्वरूपात प्रशासकीय निकड म्हणून लोकहितास्तव देण्यात आली आहे.

(आ) या तात्पुरत्या पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱ्यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

(इ) सदर तात्पुरती पदोन्नती प्रतिनियुक्तीवर बाहेर गेलेले अधिकारी रुजू होईपर्यंत किंवा पदोन्नतीच्या आदेशापासून ११ महिन्यासाठी यांपैकी जे आधी घडेल त्या कालावधीसाठी असेल.

(ई) प्रतिनियुक्तीवर असलेले ज्येष्ठ अधिकारी यांचे प्रत्यावर्तन झाल्यानंतर तात्पुरती पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांची तात्पुरती पदोन्नती संपुष्टात येईल.

(उ) प्रतिनियुक्तीवर असलेले ज्येष्ठ अधिकारी यांचे प्रत्यावर्तन झाल्यानंतर त्यांच्यासाठी सह सचिव संवर्गात रिक्त पद उपलब्ध नसल्यास या आदेशातील कनिष्ठतम अधिकाऱ्यांला पदावनत करण्याच्या अधीन राहून सदर तात्पुरत्या पदोन्नत्या देण्यात येत आहेत.

(ऊ) सदर पदोन्नती मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७, कक्ष अधिकारी संवर्गांच्या ज्येष्ठतेबाबत मा.उच्च न्यायालयाने पारीत केलेल्या दि.६.८.२०१८ रोजीच्या आदेशाबाबत मा.सर्वोच्च न्यायालयात असलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२५१८१/२०१८ व त्यातील आय.ए. क्र.२५९०/२०१९ मध्ये होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

(ए) सदर तात्पुरती पदोन्नती मा.उच्च न्यायालय, मुंबई येथील प्रलंबित असलेल्या रिट पिटीशन (स्टॅम्प) क्र.१०८७६/२०२१ व रिट पिटीशन (स्टॅम्प) क्र.१०८७८/२०२१ यामधील आय.ए.(स्टॅम्प) क्र. १०९१०/२०२१ व १०९११/२०२१ तसेच रिट पिटीशन (स्टॅम्प) क्र.१०९०९/२०२१ मध्ये होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

५. सह सचिव पदावर तात्पुरती पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांनी हे आदेश निघाल्याच्या तारखेपासून तीस दिवसामध्ये सहसचिव पदावर रुजू होणे आवश्यक आहे.

६. पदोन्नत अधिकाऱ्यांना संबंधित विभागाने सह सचिव पदावर रूजू करून घेऊन त्याबाबतच्या आदेशाची प्रत या विभागास तत्काळ अवगत करावी.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०५०४१६५७०८६६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUCHITA MOHAN MAHADIK

Digitally signed by SUCHITA MOHAN MAHADIK
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=6578e224c4a0d2c9bfb7e7e33b474757c1425d0a03e653bc4f0a25b70698158e,
serialNumber=e146a6ddc8fb6681d49a5099661d41639da6c568419f071bb9cdfd8a2e08058c, cn=SUCHITA MOHAN MAHADIK
Date: 2022.05.04 16:58:29 +05'30'

**(सु.मो.महाडिक)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. अ.मु.स. (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव- सर्व संबंधित मंत्रालयीन विभाग
५. संबंधित मंत्रालयीन विभाग (आस्थापना)
६. संबंधित अधिकारी, विभागामार्फत
७. निवड नस्ती, सग्रंहार्थ